**<u>प्रशासकीय मान्यता</u>**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाच्या व्हीआरडीएल प्रकल्पांतर्गत भारतीय वैद्यकीय संशोधन परिषद, नवी दिल्ली यांच्यामार्फत मंजूर अनुदानातून संस्थेकरिता यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर

# महाराष्ट्र शासन

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक : आयसीएन-२०१८/प्र.क्र.३४६/प्रशा-१**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,
दिनांक : १४ जानेवारी, २०१९.

**वाचा :**

१) शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/ प्र.क्र. ८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.

४) संचालक, आरोग्य संशोधन विभाग, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. व्ही.२५०११/१५८/२०१३-एचआर, दिनांक ०२.११.२०१५

५) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/ इंगाशावैमना/व्हीआरडीएल प्रकल्प/आयसीएमआरनिधी/यंसाख/१०७८८/१-म/ २०१८, दि. १५.१०.२०१८.

६) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/ इंगाशावैमना/१८-१९/१-म/६७४/२०१९, दि. १४.०१.२०१९.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर या संस्थेस केंद्र शासनाच्या व्हीआरडीएल प्रकल्पांतर्गत भारतीय वैद्यकीय संशोधन परिषद, नवी दिल्ली यांच्यामार्फत यंत्रसामुग्री खरेदी करण्याकरीता प्राप्त अनुदानातून रुपये ३०,५७,०९९/- (अक्षरी रुपये तीस लक्ष सत्तावन्न हजार नव्याण्णव फक्त) इतक्या रकमेची खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे

यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रत्येकी किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) | प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | फ्ल्युरोसेन्ट मायक्रोस्कोप | ०१ | २,८९,९७० | २,८९,९७० | २,८९,९७० |
| २ | हॉरीझेन्टल जेल इलेक्ट्रोफोरेसीस सिस्टीम | ०१ | १,८७,८९० | १,८७,८९० | १,८७,८९० |
| ३ | जेल डॉक हूड/ कॅबिनेट | ०१ | २,९०,००० | २,९०,००० | २,९०,००० |
| ४ | जेल इमेजिंग सिस्टीम | ०१ | २,९२,००० | २,९२,००० | २,९२,००० |
| ५ | ॲडजस्टेबल व्हाल्यूम डिजीटल मल्टीचॅनल पीपेटस् ८ चॅनेल, ५५ ० युल | ०१ | २३,६०० | २३,६०० | २३,६०० |
| ६ | ॲडजस्टेबल व्हाल्यूम डिजीटल मल्टीचॅनल पीपेटस् ८ चॅनेल, ३०- ३०० युल | ०१ | २३,६०० | २३,६०० | २३,६०० |
| ७ | इलेक्ट्रॉनिक मल्टीचॅनल पीपेटस् ८ चॅनेल, ०.५-१० युल | ०१ | ८२,४२३ | ८२,४२३ | ८२,४२३ |
| ८ | इलेक्ट्रॉनिक मल्टीचॅनल पीपेटस् ८ चॅनेल, ५-१०० युल | ०१ | ८२,४२३ | ८२,४२३ | ८२,४२३ |
| ९ | इलेक्ट्रॉनिक मल्टीचॅनल पीपेटस् ८ चॅनेल, १५-३०० युल | ०१ | ८२,४२३ | ८२,४२३ | ८२,४२३ |
| १० | डिजीटल ॲनालायटीकल बॅलेन्स | ०१ | ७०,००० | ७०,००० | ७०,००० |
| ११ | मिनी पीसीआर प्लेट स्पिनर | ०१ | १,१२,३७० | १,१२,३७० | १,१२,३७० |
| १२ | मायक्रोव्हेव ओव्हन | ०१ | २०,४०० | २०,४०० | २०,४०० |
| १३ | ऑटोमेटेड आरएनए प्युरीफीकेशन सिस्टीम | ०१ | १५,००,००० | १५,००,००० | १५,००,००० |
| | **एकूण** | | | **३०,५७,०९९** | **३०,५७,०९९** |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता केंद्र शासनाच्या व्हीआरडीएल प्रकल्पांतर्गत भारतीय वैद्यकीय संशोधन परिषद, नवी दिल्ली यांच्याकडून प्राप्त झालेल्या अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा करावी.

३. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया “औषधे, तद्‌अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत” निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केल्यानुसार येणारा यंत्रनिहाय खर्च सदर संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाच्या व्हीआरडीएल प्रकल्पांतर्गत भारतीय वैद्यकीय संशोधन परिषद, नवी दिल्ली यांच्यामार्फत मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११४१७१७२५९११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2019.01.14 17:31:43 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स् कॉर्पोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
६. निवडनस्ती (प्रशा-१).